सन २०१३-१४ करिता संत तुकाराम वनग्राम योजनेअंतर्गत उत्कृष्ठ गावांची (संयुक्त वनव्यवस्थापन समिती) निवड करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
महसुल व वन विभाग
शासन निर्णय क्रमांक:एफडीएम -२०१५/प्रक्र.१४२/फ-२
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुबंई-४०० ०३२,
दि. २५.०६.२०१५

वाचा :-

१) शासन निर्णय, महसुल व वन विभाग, क्रमांक-एमएससी-२०००/प्रक्र.१४३/फ-२, दि. २५.०४.२००३.
२) शासन निर्णय, महसुल व वन विभाग, क्रमांक-एफडीएम -२००५/प्रक्र.३१३/फ-२, दि. २३.११.२००६.
३) शासन निर्णय, महसुल व वन विभाग, क्रमांक-एफडीएम -२००५/प्रक्र.३१३/फ-२, दि. १५.०२.२००८.
४) शासन निर्णय, महसुल व वन विभाग, क्रमांक-एफडीएम -२००५/प्रक्र.३१३/फ-२, दि. १५.०५.२००८.

प्रस्तावना :-

राष्ट्रीय वननिती, १९८८ नुसार वनसंरक्षण आणि वन विकासामध्ये स्थानिक लोकांचा सहभाग होण्याच्या अनुषंगाने केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचना विचारात घेऊन ग्रामिणांच्या सहभागातून वनव्यवस्थापन राबविण्याचा निर्णय संदर्भ क्र. १ वरील दि. २५.०४.२००३ च्या शासन निर्णयानुसार घेण्यात आला होता. या योजनेनुसार वनक्षेत्रामध्ये व वनक्षेत्राच्या सिमेवर असणाऱ्या सुमारे १५६०० गावांपैकी अद्यापपर्यंत १२६६१ गावांमध्ये संयुक्त वनव्यवस्थापन समित्यांची स्थापना करण्यात आलेली आहे. या समित्यांनी वनांचे संरक्षण करणे व अवैध वृक्षतोड, वनक्षेत्रातील अतिक्रमण, वनवणवा, अवैध चराई इत्यादींस प्रतिबंध करणे अपेक्षित आहे. तसेच त्यांच्याकडे वर्ग केलेल्या वनांचे व्यवस्थापन करणे, ग्रामिण जनतेमध्ये वनांच्या महत्त्वाविषयी जागृती निर्माण करणे यासारखी कामे संयुक्त वनव्यवस्थापन समित्यांमार्फत करण्यात येतात.

सदरहू कामात सतत सुधारणा घडवून आणण्याच्या दृष्टीकोनातून संयुक्त वन व्यवस्थापन समित्यांमध्ये चुरस निर्माण व्हावी म्हणून दरवर्षी जिल्हास्तरावर व राज्यस्तरावर उत्कृष्ट काम

करणाऱ्या समित्यांना पारितोषिक जाहीर करण्याकरिता संत तुकाराम वनग्राम योजना राबविण्याचा निर्णय संदर्भ क्र. २ वरील दि.२३.११.२००६ च्या शासन निर्णयान्वये घेण्यात आला आहे.

सदरहु शासन निर्णयानुसार संत तुकाराम वनग्राम उत्कृष्ट संयुक्त वनव्यवस्थापन समितीस बक्षिस म्हणून रोख स्वरुपात पुरस्कार देऊन समित्यांच्या कार्याचा गौरव करण्याचा निर्णय घेण्यात आलेला आहे. तसेच मराठवाडा प्रशासकीय विभागासाठी प्रोत्साहनात्मक बक्षिस देण्याचा निर्णय संदर्भ क्र.३ वरील दि.१५.०२.२००८ च्या शासन निर्णयान्वये निर्णय घेण्यात आला आहे. सदरहु शासन निर्णयाच्या अनुषंगाने संत तुकाराम वनग्राम योजनेतंर्गत राज्यस्तरीय पुरस्काराकरिता गावांची निवड करण्यासाठी मा. मंत्री (वने) महोदयांचे अध्यक्षतेखालील झालेल्या राज्यस्तरीय निवड समितीने बैठकीत तपासणी पथकांकडून प्राप्त झालेले अहवाल विचारात घेऊन संत तुकाराम वनग्राम योजनेअंतर्गत उत्कृष्ठ गावांची (संयुक्त वनव्यवस्थापन समिती) निवड केली आहे. सदरहु समितीने निवड केल्याप्रमाणे संत तुकाराम वनग्राम योजनेअंतर्गत उत्कृष्ट गावांना (संयुक्त वनव्यवस्थापन समितीला) सन २०१३-१४ चे पुरस्कार जाहीर करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

## शासन निर्णय :-

प्रस्तावनेत नमुद केल्याप्रमाणे व राज्यस्तरीय समितीने मान्यता दिल्यानुसार सन २०१३-१४ करिता संत तुकाराम वनग्राम योजनेतंर्गत खालीलप्रमाणे गावांना (संयुक्त वन व्यवस्थापन समित्यांना) बक्षिस देण्याबाबत या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे :-

| अ क्र | वनवृत्त | जिल्हा | तालुका | समितीचे नांव | राज्यस्तरीय निवड समितीचे निर्णय |
|---|---|---|---|---|---|
| १ | गडचिरोली | गडचिरोली | कुरखेडा | गोठणगाव | प्रथम बक्षिस विभागून देण्यात यावे. |
| २ | नाशिक | अहमदनगर | अहमदनगर | गुंडेगाव (धावडेवाडी) | |
| ३ | नागपूर | नागपूर | कळमेश्वर | निमजी | |
| ४ | पुणे | पुणे | जुन्नर | बुचकेवाडी (वैष्णवधाम) | द्वितीय बक्षिस विभागून देण्यात यावे. |
| ५ | कोल्हापूर | रत्नागिरी (चि.) | दापोली | शिवाजीनगर | |
| ६ | ठाणे | ठाणे | मुरबाड | पेढरी | तृतीय बक्षिस विभागून देण्यात यावे. पण प्रत्येकी किमान रू.१,५१,०००/- |
| ७ | नागपूर | गोंदिया | अर्जुनी मोरगाव | तिडका | |
| ८ | चंद्रपूर | चंद्रपूर | सिंदेवाही | डोंगरगाव | |
| ९ | अमरावती | बुलढाणा | बुलढाणा | शेकापुर | |
| १० | औरंगाबाद | हिंगोली | हिंगोली | चोरजवळा | मराठवाडा प्रशासकीय विभागासाठी प्रोत्साहनात्मक बक्षिस |

मराठवाडा प्रशासकीय विभागामध्ये निवडलेल्या समितीस द्यावयाच्या बक्षिसाच्या रकमेएवढी म्हणजेच रु. १,५१,०००/- किमान राज्यस्तरीय प्रथम द्वितीय व तृतीय स्थान प्राप्त करणाऱ्या समितींना द्यावी असा समितीने निर्णय घेतला.

उपरोक्त बक्षिसपात्र समित्यांसदर्भातील निर्णय संबंधित समित्यांना कळविण्याबाबत त्या विभागातील मुख्य वनसंरक्षक (प्रा.) यांनी दक्षता घ्यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६२५१५११२४१९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

Dattatraye Laxman Thorat

Digitally signed by Dattatraye Laxman Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Dattatraye Laxman Thorat
Date: 2015.06.25 15:14:53 +05'30'

(द.ल.थोरात)
सह सचिव
महसूल व वन विभाग

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव
३. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
४. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
५. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) / (उत्पादन व व्यवस्थापन) / (संशोधन व शिक्षण), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
६. प्रधान मुख्य वनसंरक्षक तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वनविकास महामंडळ, रॉवेल प्लाझा, कडवी चौक, नागपूर
७. प्रधान मुख्य वनसंरक्षक तथा महासंचालक, सामाजिक वनीकरण संचालनालय, महाराष्ट्र, राज्य पुणे.
८. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास)महाराष्ट्र राज्य, नागपूर
९. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (सर्व)
१०. मुख्य वनसंरक्षक (सर्व) /वनसंरक्षक (सर्व)
११. सर्व विभागीय आयुक्त
१२. सर्व सहसंचालक/सर्व उपसंचालक, सामाजिक वनीकरण संचालनालय.
१३. सर्व जिल्हाधिकारी/सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
१४. सर्व उप वनसंरक्षक/विभागीय वन अधिकारी. (प्रधान मुख्य वनसंरक्षक कार्यालयामार्फत.)
१५. मा. मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव.
१६. सचिव (वने) यांचे स्वीय सहाय्यक.
१७. वि.का.अ./अवर सचिव/सर्व कार्यासन अधिकारी, महसुल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८. निवडनस्ती, फ-२ कार्यासन, महसुल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.